राज्यातील अल्पसंख्याक उमेदवारांकरीता
राबविण्यात येत असलेल्या रोजगारभिमुख
शुल्क प्रतिपूर्ती योजनेच्या लेखाशिर्षाच्या
नावात बदल करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अविवि -२०२१/प्र.क्र.१३/का-९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १२ ऑक्टोबर, २०२१.

वाचा:- (१) शासन निर्णय क्र.अविवि२००९/प्र.क्र.१२६/का-९ दि.४ डिसेंबर,२०१५.
(२) शासन निर्णय क्र.अविवि२०१६/प्र.क्र.१७५/का-९ दि.३१ मार्च,२०१८.
(३) शासन निर्णय क्र.अविवि २०१९/प्र.क्र.१११/का-९ दि.१० डिसेंबर,२०२०.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अल्पसंख्याक समाजातील बेरोजगार व होतकरु युवक व युवतीना व्यवसायभिमुख शिक्षणाची तसेच प्रशिक्षणाची संधी उपलब्ध करुन देऊन त्याना दैनंदिन जीवनाच्या विविध क्षेत्रामध्ये रोजगारक्षम बनविण्यासाठी अल्पसंख्याक विकास विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या कौशल्य विकासावर आधारित रोजगारभिमुख प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये सुधारणा करुन संदर्भ क्र.१ दि.४ डिसेंबर,२०१५ च्या शासन निर्णयांन्वये रोजगारभिमुख प्रशिक्षण शुल्क प्रतिपूर्ती योजना राबविण्यात येत आहे.संदर्भ क्र.२ दि.३१ मार्च,२०१८ च्या शासन निर्णयांन्वये सदर योजना कौशल्य विकास व उद्योजकता विभागाअंतर्गत कार्यरत असलेल्या महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी मार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्याचबरोबर अल्पसंख्याक समुदायातील महिला व युवकांना रोजगार व स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध व्हावी याकरीता राबविण्यात येत असलेल्या कौशल्य विकास प्रशिक्षण कार्यक्रमात सुधारणा करुन संदर्भ क्र.३ दि.१० डिसेंबर,२०२० च्या शासन निर्णयान्वये सदर कार्यक्रम देखील कौशल्य विकास व उद्योजकता विभागाअंतर्गत कार्यरत असलेल्या महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी मार्फत राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. उपरोक्त दोन्हीही प्रशिक्षण कार्यक्रमाचा खर्च एकाच लेखाशिर्षाअंतर्गत केला जात असल्यामुळे सदर लेखाशिर्षामधील योजनेच्या नावात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील अल्पसंख्याक उमेदवारांकरीता राबविण्यात येत असलेल्या रोजगारभिमुख शुल्क प्रतिपूर्ती योजनेच्या लेखाशार्षामधील योजनेच्या नावामध्ये खालील प्रमाणे बदल करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| योजनेचे नाव | जुने नाव | नवीन नाव |
|---|---|---|
| राज्यातील अल्पसंख्याक समाजातील बेरोजगार व होतकरु युवक युवतीना व्यवसायभिमुख शिक्षणाची तसेच प्रशिक्षणाची संधी उपलब्ध करुन त्यांना दैनंदिन जीवनाच्या विविध क्षेत्रामध्ये रोजगारक्षम बनविणे (२२३५ ए १५१) | मागणी क्रमांक -झेडई-०१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ सामालिक कल्याण (०१)अल्पसंख्याक सहाय्य (०९)अल्पकालीवधीच्या व्यवसायाधारित पाठयक्रमाकरीता सहायक अनुदान(कार्यक्रम) (३१) सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५ ए १५१) | मागणी क्रमांक -झेडई-०१ २२३५-सामालिक सुरक्षा व कल्याण (०१)अल्पसंख्याक सहाय्य (०९)अल्पसंख्याकांना कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देण्याच्या कार्यक्रमास सहायक अनुदान (कार्यक्रम) (३१) सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२३५ ए १५१) |
| | Demand No.ZE -01 2235- Social Security and Welfare (01)Assistance to Minorities **(09)** Grant in aid for short term trade based courses scheme (31) Grants-in-aid (Non-salary) (2235 A 151 ) | Demand No.ZE -01 2235- Social Security and Welfare (01)Assistance to Minorities **(09)** Grant-in-Aid for Skill Development Training Programs for Minorities (scheme) **(31)** Grants-in-aid (Non-salary) **(2235 A 151)** |

उपरोक्त प्रमाणे लेखाशिर्ष २२३५ ए १५१ मधील **(०९) अल्पकालीवधीच्या व्यवसायाधारित पाठयक्रमाकरीता सहायक अनुदान (कार्यक्रम) याऐवजी (०९) अल्पसंख्याकांना कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देण्याच्या कार्यक्रमास सहायक अनुदान (कार्यक्रम)** असा बदल करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ महाराष्ट्र मुंबई यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७२/२०२१/दि.४.३.२०२१/व्यय-१ सं.ख.वि/चा-१/अल्पसंख्याक विकास विभाग/युओआर-४७/२०२०-२१/२७९ दि.२३.८.२०२१ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ वित्त विभाग/ अर्थ-१४ दि.१२.४.२०२१ अन्वये प्राप्त सहमती नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३१२१७५१६८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2021.10.13 12:24:35 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,

३) मा. मंत्री /राज्यमंत्री (अवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) सचिव,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय, मुंबई,

५) महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

६) सहसंचालक (सुधारणा) सचालनाल लेखा व कोषागारे,नवीन प्रशासन भवन ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई,

७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

११) मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी,

१२) वित्त विभाग अर्थ-१४/कोषा-४, मंत्रालय, मुंबई,

१३) कक्ष अधिकारी (१४७५), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

१४) कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय मुंबई-३२.

१५) निवडनस्ती (कार्यासन ९) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.